स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद) यांनी उच्च माध्यमिक शाळा सुरु करण्यासंदर्भात....
नगर परिषद, अचलपुर, जि. अमरावती अंतर्गत नगर परिषद उर्दु माध्यमिक विद्यालय, परतवाडा, ता. अचलपुर, जि. अमरावती.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२२/प्र.क्र.३९०/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १२ मे, २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक:नमाशा-२००९/ (४९७/ ०९)/माशि-१, दिनांक ११ जून, २००९.
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिसं/माध्य/स्वयंअर्थ/२०२१-२२/एस-४/१८७६, दि. २८/०३/२०२२.

**प्रस्तावना :-**

नगर परिषद, अचलपुर, जि. अमरावती अंतर्गत नगर परिषद उर्दु माध्यमिक विद्यालय, परतवाडा, ता. अचलपुर, जि. अमरावती या माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक ( इ. ११ वी ते इ. १२ वी, कला शाखा, उर्दु माध्यम, राज्यमंडळ) वर्ग स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरु करण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास सादर केला. सदर उच्च माध्यमिक शाळेला दर्जावाढ परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत नगर परिषद, अचलपुर, जि. अमरावती यांचे परिक्षेत्रातील खालील नमुद माध्यमिक शाळेस जोडून उच्च माध्यमिक दर्जावाढ करण्यास सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | शाळेचे नाव | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | नगर परिषद उर्दु माध्यमिक विद्यालय, परतवाडा, ता. अचलपुर, जि. अमरावती | उर्दु | राज्यमंडळ | दर्जावाढ, माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक शाळा. (इ. ११ वी ते इ. १२ वी, कला शाखा ) |

**अटी व शर्ती :-**

I. सदर शाळेला उच्च माध्यमिक दर्जावाढ करण्यास स्वयं अर्थसहाय्यित तत्वावर परवानगी दिलेली असल्याने, उक्त शाळेसंदर्भात येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमान्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवळी निर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटींचे आणि शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०५१२१७१०२३९०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.05.12 17:13:28 +05'30'

**( इ. मु. काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
६. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, अमरावती.
७. मुख्याधिकारी, नगर परिषद, अचलपुर, जि. अमरावती.
८. निवडनस्ती (३९०/२०२२/एसएम २).